मूर्च्छित झाला म्हणून त्याच्या सारथ्यानें त्याचा रथ बाहेर नेला. नतर कर्ण आला अभिमन्यूनें त्याचे धनुष्य तोडले तेव्हा कर्णाच्या पाठचा भाऊ पुढें झाला तो अभिमन्यूच्या बाणानें मृत्यू पावला. त्यानतर वसातीय राजा, शल्याचा पुत्र रुक्मरथ, त्याच्याबरोबर असलेले शेंकडो राजपुत्र आणि दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण इत्यादिकाचा अभिमन्यूने वध केला तेव्हां कृपाचार्य, द्रोणाचार्य, अश्वत्थामा, कृतवर्मा आणि बृहद्बल या सहा जणानी त्याला घेरलें त्यापैकीं बृहद्बलाचा वध अभिमन्यूनें केला तेव्हा द्रोणाचार्यांच्या सागण्यावरून कर्णानें त्याचें धनुष्य तोडलें कृतवर्म्यानें घोडे मारले. इतर तिघे त्याच्यावर बाण सोडू लागले अभिमन्यूनें हातात ढाल-तलवार घेतली ती द्रोणाचार्यांनी तोडली नन्तर त्यानें चक्र घेतलें, तेंही सर्वांनीं तोडलें मग अभिमन्यूने गदा घेऊन पुष्कळ वीराचा नाश केल्यावर दु शासनाचा पुत्र आणि अभिमन्यू या दोघाचें गदा-युद्ध होत असता ते दोघेही परस्पराच्या गदेने मूर्च्छित पडले पण दु.शासनाचा पुत्र अगोदर शुद्धीवर आला. अभिमन्यू सावध होऊन उठून बसत आहे असे पाहून दु शासनाच्या पुत्रानें त्याच्या मस्तकावर गदा मारली त्याबरोबर अभिमन्यू मृत्यूच्या अधीन होऊन खालीं पडला. अभिमन्यूचा वध झाल्यावर दोन्ही सैन्यें आपापल्या निवासस्थानी (शिबिरात) गेली

अभिमन्यूच्या मृत्यूमुळें धर्मराजा फार शोक करू लागला तेव्हा व्यास महर्षि तेथें आले त्यानी धर्मराजाला मृत्यूची कथा सागितली "ब्रह्मदेवानेच प्रजेचा नाश करण्यासाठीं मृत्यूला निर्माण केले आहे. जन्मलेल्या प्राण्याला मृत्यु येणारच अभिमन्यू युद्धात लढत असता मृत्यु पावल्यामुळे तो स्वर्गाला गेला आहे त्याच्यासाठीं शोक करणें व्यर्थ आहे" असें सागून व्यास महर्षि निघून गेले

नतर सशसकाचा पराभव करून श्रीकृष्ण व अर्जुन आले अर्जुनानें अभिमन्यूकरिता पुष्कळ शोक केला नंतर जेव्हा त्याला समजलें कीं, जयद्रथामुळें पाण्डव अभिमन्यूच्या मागून जाऊ शकले नाहींत, म्हणूनच अभिमन्यूचा वध झाला, नाहीतर पाण्डवानीं त्याचें संरक्षण केलें असते, तेव्हा त्यानें (अर्जुनानें) "उद्यां सूर्यास्तापूर्वी जयद्रथ-वध करीन. न

करीन तर स्वत अग्नि-काष्ठ भक्षण करीन " अशी प्रतिज्ञा केली ती बातमी जयद्रथाला समजल्यावर तो आपल्या घरीं जाऊं लागला पण द्रोणाचार्यांनीं " आम्ही तुझें रक्षण करू, तू भिऊ नको " असें सांगितल्यामुळें तो राहिला.

त्या रात्री श्रीकृष्णांना झोप लागली नाहीं त्यांनीं दारुकाला सांगितलें कीं, " उद्या सकाळीं माझा रथ सर्व शस्त्रांनिशीं सिद्ध करून ठेव जर प्रसग पडला तर मी आपला शख विशिष्ट रीतीनें फुकीन त्याबरोबर रथ घेऊन ये अर्जुन व मी एकच असल्यामुळे त्याच्या हातून प्रतिज्ञा पूर्ण न झाल्यास मी पूर्ण करीन "

( १४ ) चवदाव्या दिवशीं सकाळी द्रोणाचार्यांनीं कौरव-सैन्याचा व्यूह करून जयद्रथास सांगितलें कीं, " तू येथून सहा कोसावर म्हणजे व्यूहाच्या मध्यें जाऊन बैस तेथें तुला कोणीसुद्धा मारू शकणार नाही जयद्रथाच्या रक्षणाकरिता भूरिश्रवा, कर्ण, अश्वत्थामा, शल्य, वृषसेन आणि कृपाचार्य यांची योजना केलेली होती त्यांच्या हाताखालीं एक लक्ष [ १,००,००० ] घोडे, साठ सहस्र [ ६०,००० ] रथ, चवदा सहस्र [ १४,००० ] हत्ती आणि एकवीस सहस्र [ २१,००० ] सज्ज पायदळ इतकें सैन्य होतें. जयद्रथ त्या सर्वांबरोबर तिकडे गेला शकटव्यूह चोवीस कोस लांब, मागें दहा कोस रुंद असा होता त्याच्यामध्यें चक्रव्यूह पुढें आणि पद्म-व्यूह मागें होता या सर्व व्यूहाच्या मध्यभागीं सुईसारखा लांब सूची-व्यूह होता सूची-व्यूहाच्या तोंडावर द्रोणाचार्य आणि अगदीं मागें जयद्रथ होता. द्रोणाचार्यांच्या संरक्षणाकरिता त्यांच्या पाठीमागे कृतवर्मा होता. दु शासन व विकर्ण हे सैन्याच्या आघाडीला होते

ही सर्व सिद्धता झाल्यावर रण-वाद्ये वाजू लागलीं पाण्डव-सैन्यही आलें चवदाव्या दिवसाच्या युद्धाला आरंभ झाला

इतक्यात अर्जुन पुढे सरसावून त्यानें आघाडीवर हत्तींचें सैन्य घेऊन असलेल्या दु शासनाचा पराभव केला तेव्हा दु शासन द्रोणाचार्यांकडे पळून गेला. नंतर अर्जुन द्रोणाचार्यांपुढें आला त्यांची प्रार्थना करून तो पुढें जाऊ लागला " मला जिंकल्यावांचून पुढें जाणें शक्य नाही " असें द्रोणाचार्यांनीं म्हटलें, त्यांच्याकडे दुर्लक्ष करून तो पुढें निघाला, तें पाहून

शत्रूला जिकल्यावाचून तू जात नसतोस ना? असे द्रोणाचार्यांनी त्याला विचारले. पण पुढें घुसता घुसताच अर्जुनानें उत्तर दिले, “ तुम्ही माझे शत्रू नव्हे, गुरु आहात. मी तुमचा शिष्य म्हणजे पुत्रच आहे ” असें म्हणत तो कृतवर्म्यासमोर आला अर्जुनाच्या रथाच्या चाकाचें रक्षण करण्याकरिता युधामन्यु आणि उत्तमौजा असे दोघे वीर होते त्याच्याशीं युद्ध करण्यात कृतवर्मा गुंतलेला पाहून अर्जुन पुढे एकटाच निघाला. त्या दोघांना कृतवर्म्यानें व्यूहात जाऊ दिलें नाहीं अर्जुन पुढें जात आहे, तें पाहून काम्बोज देशाचा राजा श्रुतायुध हातात गदा घेऊन आडवा आला ती गदा त्याला अजिंक्य होण्यासाठीं वरुणानें दिली होती देताना वरुणानें सागितलें होतें की, युद्ध न करणाऱ्यावर फेकशील, तर ती तुलाच मारील. पण स्मरण न राहून त्यानें ती गदा श्रीकृष्णावर फेकली श्रीकृष्ण युद्ध करीत नसल्यामुळे उलट फिरून त्या गदेनें श्रुतायुधाचाच नाश केला

त्यानतर श्रुतायुधाचा पुत्र सुदक्षिण, त्याच्या मागून श्रुतायु व अच्युतायु, नंतर त्याचे पुत्र नियुतायु व दीर्घायु, त्यामागून अम्बष्ठ राजा या सर्वांचा आणि पुष्कळ सैन्याचा नाश केल्यावर अर्जुनासमोर कोणीच येईना अर्जुन जयद्रथाकडे चालला तें पाहून, दुर्योधन द्रोणाचार्यांना म्हणाला, “ तुम्हाला जिंकणें शक्य नसून अर्जुन कसा गेला? माझें खाऊन तुम्ही पाण्डवाचें हित करता ” तें ऐकून द्रोणाचार्यांना वाईट वाटलें ते म्हणाले, “ अर्जुन तरुण व मी वृद्ध आहें त्याचा सारथी श्रीकृष्ण आहे त्याचे घोडे फार वेगवान् आहेत अर्जुन जे बाण सोडतो ते अर्जुन त्याच्यापुढें एक कोस गेल्यावर मागे पडतात इतका त्याच्या रथाचा वेग तुला दिसत नाहीं काय? येथें व्यूहाच्या अग्रभागीं पाण्डवाचें सैन्य आहे, अर्जुन येथें नाहीं धर्मराजाला जिवत धरण्यास ही सधि बरी आहे तेव्हा मी येथेंच युद्ध करतो तूं अर्जुनाकडे जा.” दुर्योधन म्हणाला, “ तुमच्या पुढून जो गेला, त्याला मी कसा अडवू शकेन?” तें ऐकून द्रोणाचार्यांनी मन्त्र म्हणून दुर्योधनाच्या सर्व अगावर कवच घातलें ते कवच धारण करून दुर्योधन, अर्जुनाकडे पुष्कळ सैन्य घेऊन निघाला, आणि द्रोणाचार्य तेथेच युद्ध करीत राहिले

अर्जुन पुढे चाललेला पाहून अवतिदेशाचे राजे विन्द आणि अनुविन्द हे युद्धाला आले त्याचा नाश केल्यावर अर्जुनानें श्रीकृष्णाना सांगितलें, "आपले घोडे फार थकले आहेत त्याना सोडून त्यांचें दाणा-पाणी करा." असें बोलून अर्जुनानें बाणाचें घर केल्यासारखें केले पृथ्वीचा भेद करून एक सरोवर निर्माण केले तेव्हा श्रीकृष्णानी रथाचे घोडे सोडले त्याच्या अगातले बाण काढले त्याना लोळू दिले त्याना पाणी पाजले पोहणी घातलें दाणा लावला आणि पुन्हा रथाला जोडले कौरवसैन्य आश्चर्यानें पाहतच राहिले, काही करू शकलें नाही नतर अर्जुन पुढें निघाला त्याला दुर्योधन आडवा आला त्याच्या अगात कवच होतें, तें पाहून अर्जुनानें आपले बाण त्याच्या नखाच्या आणि मासाच्या साध्यात मारले तेव्हा त्याला फार वेदना होऊ लागल्या दुर्योधनाचें रक्षण करण्यास जें सैन्य आलें, त्याचा अर्जुनाने नाश केला तें पाहून श्रीकृष्णानी आपला शख मोठ्यानें वाजविला

आता जयद्रथ फार दूर नव्हता दुर्योधनाची ती स्थिति पाहून जयद्रथाच्या रक्षणाकरिता असलेले भूरिश्रवा, अश्वत्थामा इत्यादि वीर अर्जुनाबरोबर युद्ध करू लागले

इकडे धर्मराजा द्रोणाचार्यांच्याबरोबर युद्ध करीत असता त्याचे घोडे मारल्यामुळे तो सहदेवाच्या रथात बसून पळून गेला नंतर केकयदेशाचा राजा बृहत्क्षत्र यानें कौरवाकडील क्षेमधूर्ति राजाचा वध केला. चेदिदेशाचा राजा धृष्टकेतु याने कौरवांकडील वीरधन्व्याचा वध केला मगधदेशाचा राजपुत्र व्याघ्रदत्त आणि त्याचें सैन्य याचा नाश सात्यकीनें केला ऋष्यशृंगाचा पुत्र ज्याला शालकटंकट हें दुसरे नाव होतें, त्या अलंबुष राक्षसाचा वध घटोत्कचानें केला त्यानतर सात्यकी द्रोणाचार्याशी युद्ध करीत होता

इतक्यात पूर्वी सांगितल्याप्रमाणें श्रीकृष्णानी वाजविलेल्या शखाचा शब्द धर्मराजाला ऐकू आला तेव्हा अर्जुनावर काहीतरी संकट आलें आहे, असे समजून धर्मराजानें सात्यकीला अर्जुनाच्या साह्यास जाण्याची आज्ञा केली सात्यकी द्रोणाचार्यांपुढून अर्जुनाप्रमाणेंच गेला पण द्रोणाचार्यांनी त्याचा पाठलाग केला तेव्हां सात्यकीनें त्याचा सारथी मारला. त्याबरोबर घोडे

उधळून त्याचा रथ व्यूहाच्या तोंडावर घेऊन आले सात्यकीला जलसंध आडवा आला त्याचा नाश त्यानें केल्यावर सुदर्शनाचा नाश केला नंतर दुर्योधनाचा सारथी मारून त्यालाही पळायला लावलें, तसेंच दुःशासनासही जिंकिलें

सात्यकी आत गेल्यावर द्रोणाचार्यांनी फार निकरानें युद्ध केलें त्यांनी केकयराजा बृहत्क्षत्र, चेदिराजा धृष्टकेतु व त्याचा पुत्र आणि जरासंधाचा पुत्र यांचा वध करून सैन्याचा फार नाश केला

पुन्हा अर्जुनाच्या काळजीनें धर्मराजाला फार दुःख झालें आता त्यानें भीमाला तिकडे पाठविलें, आणि सांगितलें की, अर्जुनाचें कुशल कळविण्यासाठीं तूं मोठ्यानें गर्जना कर, म्हणजे मला समजेल धर्मराजाची आज्ञा घेऊन भीम निघाला द्रोणाचार्य त्याला आडवे आले त्याचा रथ उचलून भीमानें फेकून दिला असे आठ (८) रथ फेकल्यावर तो पुढे निघाला त्याच्याशीं युद्ध करण्यास दुर्योधनाचे काही पुत्र आले, त्यांचा त्यानें नाश केला कृतवर्म्याला जिंकून पुढे गेल्यावर सात्यकी आणि अर्जुन कौरव-सैन्याबरोबर युद्ध करीत असलेले त्यानें पाहिले. त्याबरोबर त्यानें मोठ्यानें गर्जना केली तो ऐकून धर्मराजाला आनंद झाला

भीमाची गर्जना ऐकून कर्ण युद्धाला आला त्याचे घोडे आणि सारथी यांना मारल्यावर तो वृषसेनाच्या रथात बसून पळून गेला त्याच वेळीं पूर्वी कृतवर्म्यानें ज्यांना अर्जुनाबरोबर जाऊं दिलें नव्हतें, ते युधामन्यु आणि उत्तमौजा हे दोघे बाहेरून दुसरीकडच्या सैन्याचा भेद करून अर्जुना-जवळ येऊन पोचले पुन्हा कर्ण भीमापुढें युद्धाला आला पुन्हा त्याचे घोडे व सारथी यांचा नाश भीमानें केल्यामुळें तो दुसऱ्या रथात बसला कर्णाच्या साह्याला दुर्योधनानें दुर्जय आणि दुर्मुख या दोघां भावांना पाठविलें. भीमानें त्या दोघांचा (नाश) वध करून कर्णाचे घोडे व सारथी यांचा नाश केला, व कर्णावरही पुष्कळ बाण मारले, तेव्हा कर्ण पळून गेला

नंतर दुर्मर्षण इत्यादि पाच जण तुझे पुत्र आले, त्यांचाही वध भीमसेनानें केला पुन्हा एकदा कर्णाला पळायला लावल्यावर दुर्योधनाच्या आज्ञेवरून त्याचे चवदा भाऊ युद्धाला आले. त्या सर्वांचा वध भीम-

सेनाने केला त्यात विकर्ण होता यानें "द्रौपदी दासी झाली नाही" असे भर सभेत उठून सांगितले होतें तें आठवून विकर्णाच्या मृत्यूमुळे भीमसेनाला फार दु ख झालें तो म्हणाला, "सर्व कौरवाना मारण्याची प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी मी तुला मारलें. खरोखर क्षत्रिय धर्म फार निष्ठुर आहे" अशा रीतीने तुझे एकतीस [ ३१ ] पुत्र भीमाच्या हातून मृत्यु पावलेले पाहून दुर्योधनाला विदुराचें बोलणें आठवलें

भीमसेन आणि कर्ण याचें पुन्हा युद्ध जुपलें भीमाने कर्णाच्या हातातील धनुष्यें वरच्यावर तोडून पुष्कळ सैन्याचा नाश केला तेव्हा कर्णाला फार राग आला. त्याने अस्त्राने त्याच्या रथाचा व घोड्याचा नाश केला, आणि सारथ्यावर बाण मारले भीमाचा सारथी युधामन्यूच्या रथावर गेला नतर भीम मेलेल्या हत्तींच्या आड लपला एक हत्ती उचलून तो उभा राहिलेला पाहून कर्णाने बाण सोडून हत्तीचे तुकडे केले नतर हत्ती, रथ, घोडे इत्यादि भीमाने जे जे फेकलें, तें तें कर्णानें तोडून टाकलें तेव्हा भीमाने आपली मूठ कर्णाला मारण्याकरिता उगारली, पण कर्णाला मारण्याची प्रतिज्ञा अर्जुनानें केलेली असल्यामुळें त्यानें त्याला ( कर्ण ) मारले नाही उलट कर्णानें कुन्तीला दिलेलें वचन स्मरून जरी भीमाला मारलें नाही, तरी धनुष्याच्या टोकानें त्याला टोचलें, आणि "खादाड" इत्यादि शब्दानी त्याची फार निन्दा केली

भीमाने त्याला उत्तर केलें, ( दिलें ) "युद्ध करीत असता इन्द्राला सुद्धा कधी जय तर कधी पराजय पाहावेच लागतात तू तर माझ्या पुढून कित्येक वेळा पळून गेलास आता कशाला बढाई मारतोस ?" हा सर्व प्रकार अर्जुनानें पाहिला, आणि त्यानें कर्णावर तीक्ष्ण बाण मारले तेव्हा कर्ण भीमाला सोडून दूर गेला आणि मग भीमही सात्यकीच्या रथात बसून अर्जुनाकडे निघाला

सात्यकीशी युद्ध करण्यास अलबुष नावाचा राजा आला त्याचा नाश झाल्यावर दु शासन इत्यादि जे आडवे आले, त्याना जिकून सात्यकी अर्जुनाजवळ जाऊन पोचला इतक्यात भूरिश्रवा युद्धाला आला सात्यकी व भूरिश्रवा ह्या दोघानींही एकमेकाचे घोडे मारले, धनुष्यें तोडली मग ढाल-

नागार घेऊन त्यांनी युद्ध केलें तीही तुटल्यावर ते दोघे बाहु युद्ध [ कुस्ती ] करू लागले भूरिश्रव्यानें सात्यकीला उचलून भूमीवर आपटलें एका हातात तरवार घेऊन एका हातानें त्याचे केस धरले, त्याच्या छातीवर लाथ मारली, आणि त्याचें मस्तक तोडण्याचा प्रयत्न चालविला

इतक्यात श्रीकृष्णाच्या सागण्यावरून अर्जुनानें बाण मारून त्याचा तरवार धरलेला उजवा हात तोडून टाकला तेव्हा भूरिश्रवा अर्जुनाला म्हणाला, " मी दुसऱ्याबरोबर युद्ध करीत असताना माझा हात तोडून तू अत्यंत नीच कर्म केलें आहेस कृष्णाच्या सगतीचाच हा परिणाम होय " तें ऐकून अर्जुनानें सागितलें, " क्षत्रीय आपलें सैन्य बरोबर घेऊन लढत असतात त्यांनी एकमेकाचें रक्षण करावयाचें असतें, म्हणून माझा यांत कोणत्याच प्रकारचा अपराध नाही तूं मात्र स्वत चे सुद्धा रक्षण करू शकत नाहीस तर तुझ्या सैन्याचें रक्षण काय करणार ?" ते ऐकल्यावर भूमीवर दर्भ टाकून भूरिश्रवा प्रायोपवेशनाला बसला तेव्हा सात्यकीनें हातात तरवार घेतली आणि सर्व लोक ' नको ' म्हणत असता भूरिश्रव्याचे मस्तक धडापासून वेगळें केलें सात्यकीची निन्दा करणाऱ्या लोकाना सात्यकीने उत्तर दिले की, " ' शत्रूला दु खदायक जें जें असेल तें ते अवश्य करावें,' असें वाल्मीकीनें रामायणात लिहिल असल्यामुळे यात माझा काहीच दोष नाही "

सात्यकीसारख्या पराक्रमी वीराला भूरिश्रव्यानें भूमीवर कसे आपटलें ? ह्या धृतराष्ट्राच्या प्रश्नाचें उत्तर सञ्जयानें दिले—" यदूच्या वशात वसुदेव आणि शिनि हे दोघे पराक्रमी होते देवकाच्या कन्येचा स्वयवर होता. पण शिनीनें वसुदेवाकरिता कन्येला आपल्या रथात बसविलें त्या वेळी जमलेल्या राजानी युद्ध केलें इतराचा शिनीनें पराभव केला, पण सोमदत्तानें अर्धा दिवस भयकर युद्ध केले, आणि शेवटी बाहु युद्ध [ कुस्ती ] करीत असता शिनीनें सोमदत्ताला सर्वांसमक्ष भूमीवर आपटले एका हातात तरवार घेऊन दुसऱ्या हाताने त्याचे केस धरले, पण न मारता त्याला सोडून दिलें सोमदत्ताला तो अपमान सहन झाला नाही त्याने शङ्कराना प्रसन्न करून वर मागितला की, मला असा पुत्र द्या की, शिनीनें जसा माझा अपमान केला, तसाच सर्वांसमक्ष शिनीच्या पुत्राचा अपमान माझ्या

पुत्राने करावा. शङ्करानीं तो वर दिला, म्हणूनच भूरिश्रव्याला तसें करता आलें "

भूरिश्रव्याचा वध झाल्यावर अर्जुनानें कौरव-सैन्याचा पुष्कळ नाश केला इतक्यात सूर्यास्ताची वेळ जवळ आली. अजून जयद्रथाच्या रक्षणा-करिता जे मुख्य-मुख्य वीर आणि सैन्य होते त्याना सूर्यास्ताच्या आत जिंकणे शक्य नाही, असें पाहून श्रीकृष्णानीं युक्ती केली त्यानी सूर्याला झाकून टाकणारा अंधार उत्पन्न केला त्याबरोबर सूर्यास्त झाला असें समजून कौरव-सैन्य आनन्दानें माना उंच करून आकाशाकडे पाहू लागलें. त्यात जयद्रथ होताच

श्रीकृष्णानी अर्जुनाला सांगितलें, "तो पहा जयद्रथ बाण मारून त्याचें मस्तक असें उडव की, त्याचा पिता वृद्धक्षत्र कुरुक्षेत्राबाहेर तपश्चर्या करीत बसला आहे, त्याच्या मांडीवर तें पडलें पाहिजे. कारण, जयद्रथाचें मस्तक जो भूमीवर पाडील, त्याच्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होतील असें त्यानेंच सांगितलें आहे म्हणजे एका बाणानें दोघांचाही वध होईल" तें ऐकून अर्जुनानें बाण सोडला त्या बाणानें जयद्रथाचें मस्तक संध्या करीत बसलेल्या वृद्धक्षत्राच्या मांडीवर नेऊन टाकलें तो जप करून उठल्याबरोबर तें मस्तक भूमीवर पडलें आणि तो वृद्धक्षत्रही तत्क्षणीच मृत्यु पावला जयद्रथाचा वध झाल्यावर श्रीकृष्णानीं सूर्याला झाकणारा अंधार दूर केला नंतर श्रीकृष्ण, अर्जुन, भीम, सात्यकी, युधामन्यू आणि उत्तमौजा या सर्वांनीं आपापले शङ्ख मोठ्यानें वाजविले. तो शब्द ऐकून जयद्रथाचा वध झाल्याचें धर्मराजाला कळलें, आणि त्यानेंही वाद्यें वाजवून सर्व पाण्डव-सैन्याला आनन्दित केलें

जयद्रथाचा वध झाल्यावर कृपाचार्य व अश्वत्थामा अर्जुनावर चालून आले. त्याचा पराजय अर्जुनानें केल्यावर कर्ण आला त्याला सात्यकीनें अडविलें. पण सात्यकीला स्वतन्त्र रथ नसल्यामुळें श्रीकृष्णांनी आपल्या शङ्खाचा विशिष्ट शब्द केला त्याबरोबर दारुकानें रथ आणला त्यात बसून सात्यकीनें कर्णाचा पराभव केला तेव्हा तो दुर्योधनाच्या रथावर गेला

इतक्यात सूर्य अस्ताला गेला तेव्हां श्रीकृष्ण, अर्जुन, भीम, सात्यकी इत्यादि सर्व धर्मराजाकडे गेले. धर्मराजा सर्वांना मोठ्या आनन्दानें भेटला

पुन्हा रात्रीच्या वेळी युद्धाला प्रारभ झाला पाण्डवांचा पराक्रम पाहून दुर्योधनाला दु ख झालें तेव्हा कर्ण म्हणाला, " मी जाऊन सर्व पाण्डवाचा नाश करतो " ह्या त्याच्या बढाईच्या भाषणावरून कृपाचार्य व अश्वत्थामा यानी त्याची निन्दा केली तेव्हा कर्णाचें व अश्वत्थाम्याचें भाडण हात-घाईवर आलें, पण दुर्योधनानें दोघानाही शान्त केलें नंतर कर्ण युद्ध करू लागला त्यानें पाण्डव-सैन्याचा पुष्कळ नाश केला उलट भीम, अर्जुन, सात्यकी आणि धृष्टद्युम्न यानीं कौरव-सैन्याचा तसाच नाश चालविला. त्या युद्धात सात्यकीने सोमदत्ताचा वध केला नतर अधार फार पडला. काही दिसेना, तेव्हा दोन्ही सैन्यात मशाली पेटवून युद्ध होऊ लागलें

सात्यकीनें भूरीचा नाश केला भीमसेनानें दुर्योधनाला आणि कर्णानें सहदेवाला पळायला लावले त्या युद्धात कर्ण कोणालाच आटोपेना, आणि त्याच्याजवळ अर्जुनासाठी पुजून ठेवलेली शक्ती असल्यामुळें श्रीकृष्ण अर्जुनाला त्याच्यासमोर जाऊ देईनात तेव्हा अर्जुनाने घटोत्कचाला कर्णावर पाठविले जटासुराचा पुत्र अलबुप राक्षस त्याला आडवा आला त्याचा वध घटोत्कचाने केल्यावर अलायुध नावाचा राक्षस युद्धाला आला त्याचाही नाश त्याने केला नतर घटोत्कच आणि कर्ण याचे युद्ध होऊ लागलें. घटोत्कच आटोपत नाही, असें पाहून कर्णानें अस्त्र सोडलें, आणि त्याचे रथ, सारथी आणि घोडे याचा नाश केला तेव्हा घटोत्कच गुप्त झाला त्यानें आपली माया प्रकट केली त्याबरोबर कौरव-सैन्यावर सर्व दिशातून निर-निराळी शस्त्रें येऊन पडू लागली, आणि त्याचा फार नाश होऊ लागला

तेव्हा त्या सर्वांनी कर्णाला सागितलें कीं, " अर्जुनासाठी जी शक्ती तू ठेवली आहेस, ती घटोत्कचावर टाक ह्या सहारातून वाचलो तर आपण सर्व मिळून अर्जुनाचा वध करू " त्याच्या सागण्याप्रमाणें कर्णाने अर्जुना-साठी ठेवलेली, इन्द्रानें दिलेली, ती वासवी शक्ती घटोत्कचावर फेकली त्याबरोबर घटोत्कचाच्या मायेचा नाश होऊन घटोत्कचाचाही नाश झाला. मात्र घटोत्कचाने मरता मरता आपलें शरीर एवढें वाढविलें कीं, त्याच्या

शरिराखाली चिरडून कौरवाचे एक अक्षौहिणी सैन्य नाश पावलें. घटोत्कचाचा वध झाल्यामुळे कौरवाना, आणि कर्णाजवळ आता शक्ती राहिली नसल्यामुळे श्रीकृष्णाना अत्यत हर्ष झाला

नतर युद्ध होत असताना सर्वांनाच थकव्यामुळे फार झोप येऊ लागली. युद्ध करण्याचे कोणालाच सुचेना तेव्हा अर्जुनाच्या सूचनेवरून सर्वजण झोपी गेले काही वेळानें चन्द्र उगवला (उदयाला आला) जिकडे तिकडे उजेड झाला तेव्हा दहा घटका रात्र उरली होती नतर दोन्ही सैन्यें उठली व पुन्हा युद्धाला प्रारभ झाला

त्या वेळी द्रोणाचार्यांनी द्रुपदराजा, विराटराजा, आणि द्रुपदराजाचे तीन नातू याचा वध केला इतक्यात सूर्योदय झाला सर्वजण आपापल्या वाहनावरून उतरले, त्यानी सूर्याकडे तोड करून हात जोडून संध्येच्या वेळचा जप केला

(१५) पुन्हा पधराव्या दिवसाच्या युद्धाला आरभ झाला या वेळीं द्रोणाचार्यांनी अस्त्र सोडून अस्त्र न येणाऱ्या सैन्याचा फारच नाश केला. तेव्हा श्रीकृष्णानी सागितलें, " युद्धात द्रोणाचार्यांना जिकता येणार नाहीं. अश्वत्थामा मेला असे जर याना कोणी सागेल तर हे (द्रोणाचार्य) शस्त्र खाली ठेवतील त्या वेळी ह्याचा वध होईल " इतक्यात मालवदेशाचा राजा इन्द्रवर्मा याचा अश्वत्थामा नावाचा हत्ती भीमानें मारला भीमानें श्रीकृष्णाच्या सूचनेप्रमाणे द्रोणाचार्यांना 'अश्वत्थामा मेला' असें मोठ्यानें ओरडून सागितलें ही गोष्ट अशक्य आहे असें समजून भीमाच्या सागण्याकडे दुर्लक्ष करून द्रोणाचार्य युद्ध करीतच राहिले त्यानी ब्रह्मास्त्र सोडलें व लक्षावधि सैन्याचा नाश केला ते पाहून पुष्कळ ऋषी द्रोणाचार्यांकडे आले " हें युद्ध तुम्ही अधर्माने करीत आहात तुमच्या मृत्यूची वेळ जवळ आली आहे. आता शस्त्र खाली ठेवा पुन्हा असें नीच कर्म करू नका " असें ऋषींनीं त्याना सागितलें

" ऋषींचें हें बोलणें, भीमाचें तें बोललेलें भाषण व समोर आपल्या मृत्यू-करतांच जन्माला आलेला धृष्टद्युम्न उभा आहे," हा सर्व विचार मनात येऊन द्रोणाचार्यांना फार दु ख झालें त्यापैकी भीमाच्या बोलण्याचा खरे-

खोटेपणा समजून घेण्याकरिता त्यांनी ती गोष्ट धर्मराजाला विचारली. धर्मराजाने श्रीकृष्णाच्या सांगण्यामुळें, आणि ' खोटे बोललें तर पाप लागतें, पण न बोलावे तर जय मिळत नाहीं ' हा विचार मनात आल्यामुळें, द्रोणाचार्यांनी विचारल्यावर " अश्वत्थामा मेला ' असे मोठ्यानें सागितलें व ' हत्ती ' असें मनात म्हटले पण तेवढें खोटें बोलल्यामुळें धर्मराजाचा जो रथ पूर्वीं पृथ्वीच्या वर चार बोटें राहत असे तो पृथ्वीला टेकला

धर्मराजाने " अश्वत्थामा मेला " हे सागितल्यावर द्रोणाचार्यांना शका राहिली नाही त्यानी दु खानें शस्त्र खाली ठेवलें, प्राणायाम करून समाधी लावली आणि परमात्म्याचें ध्यान करीत शरीर सोडले. इतक्यात धृष्टद्युम्नानें येऊन त्याचें मस्तक तरवारीनें तोडलें.

द्रोणाचार्यांच्या वधाची बातमी ऐकून अश्वत्थाम्यानें पाण्डव-सैन्यावर ' नारायणास्त्र ' सोडले तेव्हा श्रीकृष्णानी सागितलें, " वाहनावरून खाली उतरा, हातातील शस्त्रे टाकून द्या, म्हणजे हे अस्त्र शांत होईल ह्याला दुसरा उपाय नाही " त्याप्रमाणें सर्वांनी केलें, पण भीम ऐकेना ते अस्त्र भीमावर जाऊन पडले तेव्हा श्रीकृष्ण व अर्जुन ह्या दोघानी अस्त्राच्या आंत जाऊन भीमाच्या हातातलें शस्त्र काढून घेतलें, आणि त्यालाही रथांतून खाली ओढलें तेव्हा तें अस्त्र शात झालें त्यानतर कौरव-पाण्डवाचें सैन्य आपापल्या निवासस्थानी ( शिबिरात ) गेले

अशा रीतीनें युद्धाचे पधरा दिवस पूर्ण झाले

— द्रोणपर्वाचा मराठी साराश समाप्त —

---

## महाभारतसारांतील ‘ कर्णपर्वा ’चा मराठी सारांश

वैशपायन म्हणाले, “ जनमेजय राजा, दोन दिवस युद्ध करून कर्ण मृत्यु पावल्यावर सञ्जयाने हस्तिनापुरास येऊन ती बातमी धृतराष्ट्राला सांगितली तेव्हा कर्णाच्या मृत्यूमुळे आता कौरवाचा नाश अटळ आहे, ह्या समजुतीनें धृतराष्ट्रानें फार शोक केला, आणि युद्धाचे समग्र वर्तमान सञ्जयाला विचारलें ” तेव्हा सञ्जय सांगू लागला—

द्रोणाचार्यांच्या मृत्यूमुळें सर्व कौरव काही वेळ शोक करीत बसले नंतर सर्वांच्या सम्मतीनें दुर्योधनानें कर्णाला सेनापतीच्या अधिकारावर नेमलें प्रात काळी कौरव-सैन्याचा मकर-व्यूह रचून कर्ण युद्धासाठी सिद्ध झाला इकडे पाण्डवानी आपल्या सैन्याचा अर्ध चन्द्रा कार-व्यूह केला होता

( १६ ) नंतर सोळाव्या दिवशी त्या दोन्ही सैन्याच्या युद्धाला प्रारम्भ झाला त्या युद्धात एकदा भीमसेन हत्तीवर बसून कौरव-सैन्यामध्ये घुसला असता कुलूतदेशाचा राजा क्षेमधूर्ति त्याच्यासमोर युद्धाला आला तोही हत्तीवरच होता त्या दोघाचे युद्ध होता होता भीमाने आपल्या गदेने त्याच्या हत्तीला व त्या क्षेमधूर्तीला मारून टाकलें अर्जुनाचा पुत्र श्रुतकर्मा याने अभिसारदेशाचा राजा चित्रसेन याचा आणि धर्मराजाचा पुत्र प्रति-विन्ध्य याने चित्रराजाचा वध केला तेव्हा अश्वत्थामा भीमावर धावून आला भीमाचें व त्याचे पुष्कळ वेळ युद्ध झाल्यावर ते दोघेही परस्पराच्या बाणानी रथात मूर्च्छित पडले तेव्हा त्याच्या सारथ्यानी त्याचे रथ युद्ध-भूमीच्या बाहेर नेले

काही वेळाने सावध होऊन अश्वत्थामा, दक्षिण दिशेकडे अर्जुन सशप्त-काचा नाश करीत होता, त्याला युद्धासाठी बोलावू लागला तेव्हा श्रीकृष्णानी रथ तिकडे वळविला अर्जुन व अश्वत्थामा एकमेकावर बाणाची वृष्टी करीत असता अर्जुनानें नेम धरून त्याच्या घोड्याचे लगाम तोडून टाकले त्याबरोबर घोडे उधळून त्याचा रथ कर्णाच्या सैन्याकडे घेऊन गेले. अर्जुन पुन्हा सशप्तकाचा नाश करू लागला इतक्यात उत्तर

दिशेकडून पाण्डव-सैन्यात आरडा-ओरड चाललेली श्रीकृष्णानी ऐकली तेथे मगधदेशाचा राजा दण्डधार हत्तीवर बसून त्या सैन्याचा नाश करीत होता लगेच श्रीकृष्णानी अर्जुनाचा रथ तिकडे नेला तेव्हा दण्डधारानें श्रीकृष्ण व अर्जुन या दोघावरही बाण सोडून मोठ्यानें गर्जना केली. इतक्यात अर्जुनानें आपल्या बाणानी त्याचें धनुष्य, त्याचे दोन्ही हात आणि मस्तक तोडून त्याचा नाश केला आणि हत्तीलाही मारले तें पाहून त्याचा भाऊ दण्ड अर्जुनावर चालून आला त्याचेंही मस्तक अर्जुनानें उडविलें, आणि दक्षिणेकडे जाऊन सशप्तकाचा नाश करण्यास पुन्हा आरभ केला

इकडे पाण्ड्य राजा कर्णाच्या सैन्याचा नाश करीत आहे, हें पाहून अश्वत्थामा त्याला आडवा आला त्या वेळीं अश्वत्थाम्यानें बाणाचा पाऊसच पाडला आठ आठ बैल जोडलेल्या आठ गाड्यात भरलेले बाण दीड तासात अश्वत्थाम्यानें सोडले. ते सर्व बाण पाण्ड्य राजानें वायु अस्त्र सोडून उडवून लावले अश्वत्थाम्यानें त्याच्या रथाचे घोडे मारल्यावर तो एका हत्तीवर बसून युद्ध करू लागला तेव्हा अश्वत्थाम्यानें आपल्या बाणानी त्या हत्तीला व पाण्ड्य राजालाही यमाच्या नगरीला पाठविलें आता नकुल आणि कर्ण याचें युद्ध जुपलें त्या युद्धात कर्णानें नकुळाचे घोडे आणि सारथी याचा नाश केल्यावर नकुल पळू लागला असता त्याच्या गळ्यात धनुष्य अडकवून कर्ण याला म्हणू लागला, “ आमच्याशी युद्ध करण्याचें सोडून दे तुला आम्ही भारी आहोत ” असें बोलून कुन्तीला वचन दिल्याप्रमाणे कर्णानें त्याला सोडून दिलें, व तो पाण्डव-सैन्याचा नाश करू लागला हें युद्ध दुपारी झाले

दुसरीकडे धर्मराजा व दुर्योधन याचें युद्ध होत असता धर्मराजाच्या बाणानें दुर्योधन मूर्च्छित पडलेला पाहून भीम म्हणाला, “ ह्याला मी मारणार आहें तुम्ही मारू नका ” इतक्यात कृपाचार्य दुर्योधनाच्या साह्याला आलेले पाहून भीम गदा घेऊन त्याच्या सैन्यावर धावून गेला. तें युद्ध तिसऱ्या प्रहरी झालें

सध्याकाळीं कर्णाला पुढें करून कौरवाचें सैन्य युद्धाला आल्यावर अर्जुनानें बाणाच्या वृष्टीनें आकाश भरून टाकलें तेव्हा कर्णानें अस्त्र सोडलें, आणि अर्जुनाचे बाण तोडून पाण्डव-सैन्याचा नाश त्याच अस्त्रानें चालविला. ते पाहून अर्जुनानें आपल्या अस्त्रानें त्या अस्त्राचा नाश करून कौरव-सैन्याचा धुव्वा उडविला. आता सूर्यास्त झाल्यामुळें कौरव-सैन्य शिबिरात गेलेलें पाहून पाण्डव-सैन्यही आपल्या निवासस्थानीं (शिबिरात) आले अशा रीतीनं सोळाव्या दिवशीं युद्ध झालें

सतराव्या दिवशी सकाळी कर्ण दुर्योधनाला म्हणाला, "आज अर्जुनाला मारल्यावाचून मी परत येणार नाही जरी अर्जुनाच्या धनुष्या-पेक्षा माझें धनुष्य श्रेष्ठ आहे, तरी त्याला जसा श्रीकृष्ण सारथी आहे, तसा मला जर शल्य सारथी मिळेल तर अर्जुनाचा नाश मी अवश्य करू शकेन" तें ऐकून दुर्योधन शल्यास 'कर्णाचा सारथी' होण्यास विनवूं लागला. परन्तु शल्य फार रागावला आणि दुर्योधनाला म्हणाला, 'मी क्षत्रिय राजा असून मला एका 'सूताचा' सारथी होण्यास सागतोस? हा अपमान मला सहन होणार नाही असे असेल तर मी आपला घरी जातो" तेव्हां दुर्योधनानें त्याची फार स्तुती केली आणि सागितलें की, "श्रेष्ठानें कनिष्ठाचा सारथी होण्याची चाल पूर्वींपासून चालत आली आहे शंकरानीं त्रिपुरासुराचा वध केला, त्या वेळीं त्याच्या रथावर प्रत्यक्ष ब्रह्मदेव सारथी होते. तुम्ही कृष्णापेक्षा सुद्धा उत्तम सारथी आहात तुम्ही जर कर्णाचें सारथ्य कराल तर कर्णाला निश्चयानें विजय मिळेल" शल्य म्हणाला, "सर्वांसमक्ष तू मला कृष्णापेक्षा श्रेष्ठ म्हणतोस म्हणून मी अत्यत सन्तुष्ट झालों आहें मी कर्णाचे सारथ्य अवश्य करीन पण एकच अट आहे मी कर्णाला वाटेल तसें बोलेन. तें त्यानें सहन केलें पाहिजे" ती अट दुर्योधन व कर्ण ह्या दोघानाही मान्य झाल्यावर शल्य रथावर बसला, आणि कर्ण रथात बसून युद्धाला निघाला.

जेव्हा कर्ण अर्जुनाला मारण्याच्या बढाया मारू लागला, तेव्हा त्याचा युद्धाचा उत्साह कमी करण्याकरिता कर्णाची शल्यानें वाटेल तशी निंदा केली. कारण कर्णाचा तेजो-भग करीन असें 'उद्योग-पर्वांत' शल्याने धर्मराजाला

आश्वासन दिलें होतें. त्याप्रमाणे त्यानें केलें. ते ऐकून कर्ण रागावलेला पाहून त्याला आणखी चिडविण्याकरिता शल्यानें त्याला एक गोष्ट सांगितली "एक श्रीमान् वैश्य समुद्रतीरीं राहत असे त्याला पुष्कळ पुत्र होते ते प्रति-दिवशीं नानाप्रकारची पक्वान्नें खाऊन उरलेलें उष्टें एका कावळ्याला देत असत त्याचें उष्टें खाऊन तो कावळा माजला आणि 'कोणताच पक्षी आपली बरोबरी करणार नाहीं' असें समजू लागला एके दिवशीं समुद्र-तीरीं पुष्कळ हंस आले वैश्याच्या पुत्रांनी कावळ्याला म्हटलें, "तू तर सर्व पक्ष्यांत श्रेष्ठ आहेस" त्याला ते खरें वाटून तो हंसाबरोबर उडण्याची बढाई मारूं लागला हंस म्हणाले, "तू आमच्याबरोबर कसा उडूं शकशील?" कावळा म्हणाला, "उडण्याचे एकशें एक प्रकार मला माहीत आहेत, आणि एकेका प्रकारानें शंभर योजनें मी उडू शकतों" एक हंस म्हणाला, "सर्व पक्ष्यांप्रमाणे मलाही उडतां येतें" नंतर दोघे उडू लागले समुद्रा-वर दूर गेल्यावर कावळा दमला, जिकडे तिकडे पाणीच पाणी आहे व उतरा-वयाला झाडझुडूप काही नाहीं, असें पाहून तो फार घाबरला पुढें त्याच्यानें उडवेना. तो समुद्राच्या पाण्यात गटंगळ्या खाऊं लागला, तेव्हा हंसाला त्याची दया आली, आणि "हा उडण्याचा कोणता प्रकार आहे? या प्रकाराचें नांव काय?" इत्यादि बोलून कावळ्याला हंसानें आपल्या पाठीवर घेतलें, आणि समुद्राच्या काठावर आणून सोडलें"

ही गोष्ट सांगून शल्य कर्णाला म्हणाला, "त्या कावळ्यासारखाच तू कौरवांच्या उष्ट्यावर पोसलेला आहेस, आणि गर्वानें फुगून अर्जुनाला जिंकण्याची इच्छा करीत आहेस अरे, उत्तर गोग्रहणाचे वेळी एकटा अर्जुन सापडला असतां त्याला तू कां मारलें नाहींस? खरोखर अर्जुन सूर्य आहे, आणि तू आहेस काजवा कोल्हा व सिंह, ससा व हत्ती, उंदीर व मांजर, कुत्रा व वाघ, खोटें व खरें आणि विष व अमृत याप्रमाणेंच तुझ्यांत व अर्जुनांत अंतर आहे तू त्याची बरोबरी सुद्धा करूं शकत नाहीस, तर, त्याला जिंकण्याची गोष्ट तर दूरच राहिली"

शल्याचें बोलणें ऐकून कर्ण फार रागावला त्यानें शल्याची, त्याच्या देशाची, त्याच्या आचाराची फारच निन्दा केली, आणि सांगितलें की,

" आताच तुला मारून टाकले असतें, पण वचन देऊन बसलो आहे. पुन्हा जर असें भाषण करशील तर तें मी सहन करणार नाही " त्याचें असें भाषण चाललेलें पाहून दुर्योधनानें दोघांचीही समजूत केली त्यानंतर कर्ण युद्धाला प्रवृत्त झाला.

( १७ ) सतराव्या दिवशी युद्धाला आरंभ झाला. त्या वेळीं संशप्तकांचा नाश करण्याकरिता अर्जुन दक्षिणेकडे गेला, व कर्ण पाण्डव-सैन्याचा नाश करू लागला धर्मराजानें कांहीं वेळ कर्णाशी युद्ध केले, पण शेवटी पराभव पावून तो पळून जाऊ लागला कर्णानें त्याचा पाठलाग केला पण कुन्तीला दिलेले आश्वासन आठवून त्यानें धर्मराजाला सांगितले कीं, " जा, तुला मी जिवंत सोडतों. पुन्हा माझ्याबरोबर युद्ध करू नकोस " त्यानंतर भीमाचा पराक्रम पाहून कौरव-सैन्य पळूं लागलें कर्ण भीमापुढें युद्धाला आला, पण भीमसेनाच्या बाणांनीं तो मूर्च्छित पडला तेव्हा त्याचा रथ शल्यानें दूर नेला नंतर दुर्योधनाचे बन्धू भीमावर चालून आले, पण तेही अग्नीवर पडलेल्या किड्याप्रमाणें मरून गेले पुन्हा कर्ण पाण्डव-सैन्याचा नाश करू लागला

इतक्यात संशप्तकांना पळवून लावून अर्जुन उत्तर दिशेकडे आला तेव्हा अश्वत्थाम्याचे व त्याचें भयंकर युद्ध झालें त्या युद्धात अर्जुनाचे बाण लागून अश्वत्थामा मूर्च्छित पडल्यामुळें त्याचा रथ सारथ्यानें दूर नेला नंतर दुर्योधन धर्मराजाबरोबर युद्ध करीत असता कर्ण येऊन धर्मराजावर बाणांची वृष्टी करू लागला नकुळ व सहदेव धर्मराजाच्या साह्याला होते कर्णानें धर्मराजा व नकुळ यांच्या रथांचे घोडे मारल्यावर ते दोघे सहदेवाच्या रथांत बसले. त्या वेळीं शल्य कर्णाला म्हणाला, " कर्णा, यांना मारून तुला काय मिळणार आहे ? अर्जुनाच्या वधासाठी दुर्योधनानें तुझा एवढा (एव्हढा) मान ठेवला आहे, म्हणून त्याला मारणें हेंच तुझें कर्तव्य आहे दुसरें, दुर्योधन भीमसेनाबरोबर युद्ध करीत आहे त्याला वाचविण्याचे सोडून येथें काय आपली शक्ती वाया घालवितोस ?" ते ऐकून कर्ण दुर्योधनाकडे गेला, आणि धर्मराजाला कर्णाचे बाण फार लागल्यामुळे तो शिबिरात येऊन आथरुणावर पडून राहिला

धर्मराजा युद्धात कोठे दिसेना, म्हणून त्याचा शोध करीत श्रीकृष्ण व अर्जुन शिबिरात आले त्याना पाहून ते कर्णाला मारूनच आले, असें समजून धर्मराजानें त्याची फार स्तुती केली. पण अर्जुनानें जेव्हा खरी गोष्ट सांगितली, तेव्हा तो धर्मराजा फारच रागावला आणि अर्जुनाची निन्दा करून "तू आपले गाण्डीव धनुष्य दुसऱ्याला देऊन टाक, म्हणजे तो तरी कर्णाचा नाश करील" असे म्हणाला त्यावरोबर अर्जुन खड्ग उपसून धर्मराजाला मारण्यास निघाला अर्जुनानें आपल्या मनात अशी प्रतिज्ञा केलेली होती की, "जो गाण्डीव धनुष्य दुसऱ्याला दे असें म्हणेल, त्याचा शिरच्छेद करावयाचा" ती गोष्ट श्रीकृष्णाना समजल्यावर त्यानीं अर्जुनाची चागलीच कानउघाडणी केली हिंसा आणि अहिंसा, सत्य आणि असत्य याचा विचार समाजधारणेच्या दृष्टीने कसा करावा ते अर्जुनाला समजावून सांगितलें. एका व्याधाने सर्व समाजास त्रासदायक झालेल्या श्वापदाची हिंसा करून सुद्धा तो स्वर्गास कसा गेला, आणि एक तपस्वी ब्राह्मण चोरांना खरा मार्ग दाखवून चोरांनी त्या मार्गानें गेलेल्या लोकाची हिंसा केल्यामुळें कसा नरकात पडला, ते सांगितल्यावर श्रीकृष्ण म्हणाले, "श्रेष्ठाला 'तू' असें म्हणून त्याचा अपमान केल्यास त्याचा वध केल्यासारखाच होतो तू धर्मराजाची निन्दा कर, म्हणजे तुझी प्रतिज्ञा पूर्ण केल्याप्रमाणें होईल." त्याप्रमाणें अर्जुनानें धर्मराजाची निन्दा केल्यावर अर्जुन पुन्हा खड्ग घेऊन उभा राहिला, आणि "वडील बन्धूचा अपमान माझ्या हातून घडल्यामुळें मी आत्महत्या करतो" असें म्हणाला तेव्हा श्रीकृष्ण हसून म्हणाले, "त्यासाठीं एवढें कशाला पाहिजे? तू आपल्या तोंडाने स्वतःची स्तुती कर म्हणजे झालें" त्याप्रमाणें अर्जुनाने आत्मस्तुती केलेली ऐकल्यावर पूर्वी केलेल्या निन्देमुळें रागावलेला धर्मराजा वनात जायला निघाला तेव्हा श्रीकृष्णानी त्याचे पाय धरून त्याला शात केले अर्जुनानेही धर्मराजाला नमस्कार केला, आणि कर्णवधाची प्रतिज्ञा करून अर्जुन युद्धाला निघाला

रणागणात आल्यावर अर्जुनानें युद्ध करीत असलेल्या भीमाला धर्मराजाचें कुशल कळविले, आणि ते दोघे कौरव-सैन्याचा नाश करू लागले अर्जुनानें रथ, घोडे व पायदळ याचा आणि भीमानें हत्तीचा नाश करण्याचा सपाटा

चालविलेला पाहून दुःशासन भीमावर धावून आला त्या दोघांचे काही वेळ युद्ध झाल्यावर भीमसेनानें आपली गदा दुःशासनावर अशी मारली कीं, तो रथातून उडून चाळीस हात दूर जाऊन पडला लागलीच हातात खड्ग घेऊन भीम धावत गेला ज्या हातानें त्यानें भारतवर्षांच्या साम्राज्ञीचे-द्रौपदीचे केस ओढले होते, ज्या हातानें पाण्डवाचा सर्वश्रेष्ठ मानबिंदू असलेल्या द्रौपदीचें वस्त्र फेडण्याचा निर्घृण प्रयत्न केला होता, तो दुःशासनाचा हात तोडून भीमसेन त्याच्या कंठावर पाय देऊन उभा राहिला आणि "ज्याच्या अंगात धैर्य असेल त्यानें ह्याला-नरपशूला-वाचवावें मी याचें रक्त पिणार आहें" असें कौरवाकडील मोठ्या-मोठ्याची नावे घेऊन ओरडून सांगितल्यावर दुःशासनाचे वक्षःस्थळ फाडून त्यातील गरम रक्त ओंजळीनें पिऊ लागला तें पाहून हा प्रत्यक्ष राक्षस आहे, असे समजून कौरव-सैन्य पळून गेलें. पण दुर्योधनाचे दहा बन्धू भीमावर आणि कर्णाचा पुत्र वृषसेन अर्जुनावर चालून आले भीमानें त्या दहा जणांचा आणि अर्जुनानें वृषसेनाचा कर्ण व दुर्योधन याच्यासमक्ष वध केला.

अर्जुनाने आपल्यासमक्ष वृषसेनाचा वध केलेला पाहून मोठ्या रागानें कर्ण अर्जुनाबरोबर युद्ध करूं लागला त्या दोघांच्या युद्धाच्या वेळी युद्ध पाहण्यास आलेल्या देव दैत्यामध्यें सुद्धा दोन तट पडले अर्जुनाकडे इन्द्रादि देव होते, व कर्णाचा पक्ष सूर्य आणि दैत्य यानीं घेतला होता युद्धांत दोघानीही निरनिराळ्या अस्त्राचा प्रयोग चालविला होता कोणाचाच जय किंवा पराजय दिसेना अर्जुन आटोपत नाही, हे पाहून कर्णानें इतके दिवस पुजून ठेवलेला, आणि खास अर्जुनासाठीच राखून ठेवलेला, सर्पमुख बाण अर्जुनावर सोडला त्याच बाणात खाण्डव-वनातून निसटलेला 'अश्वसेन' नाग येऊन अर्जुनाचा सूड घेण्यासाठीं बसला होता तो बाण सुटलेला पाहताच श्रीकृष्णानीं अर्जुनाचा रथ खालीं दाबला. त्यामुळें तो बाण अर्जुनाचा मुकुट घेऊन गेला. नतर अर्जुनानें डोक्याला शुभ्र वस्त्र बांधलें. जो नाग बाणात बसला होता, तोच नाग कर्णाकडे जाऊन "पुन्हा मला सोड, म्हणजे मी अर्जुनाला मारतों" असें म्हणाला. पण "दुसऱ्याच्या भरवशावर युद्ध करण्याची माझी इच्छा नाहीं" असें कर्णानें सांगितल्यावर

तो नाग स्वत च अर्जुनावर बाणामारखा धावून आला. ते पाहून अर्जुनाने बाण सोडून त्याचे तुकडे केले

पुढे काही वेळ कर्णार्जुनाचें युद्ध चालले होते इतक्यात कर्णाला ( शापामुळे ) अस्त्राचे मन्त्र आठवत नाहीसे झाले, आणि त्याच्या रथाचे डावे चाक ( शापामुळे ) पृथ्वीनें गिळलें. तेव्हा कर्णानें धर्माची निन्दा केली तो खाली उतरला, आणि अर्जुनाला म्हणाला, "मी रथाचे चाक उपसून काढीत आहे. या वेळी माझ्यावर बाण सोडशील तर ते धर्माच्या विरुद्ध होईल" त्याचे ते भापण ऐकून श्रीकृष्ण कर्णाला म्हणाले, "आता तुला धर्म आठवतो, पण ज्या वेळी भर सभेत भारतवर्षाची साम्राज्ञी–महासती द्रौपदीची रजस्वलावस्थेत विटंबना केलीत, पाण्डवाना जाळण्याचा प्रयत्न केलात, भीमाला विपान्न खाऊ घातलेत, एकट्या अभिमन्यूला पुष्कळांनी मिळून मारलेत, त्या वेळी तुझा धर्म कोठे गेला होता ? ( तेव्हा गेला होता कोठे राधासुता तुझा धर्म—( मोरोपत ) ) आता धर्म तुझें रक्षण करण्यास असमर्थ आहे 'अर्जुना ! बघतोस काय ? सोड बाण नि तोड कर्णाचा कण्ठनाल ' " श्रीकृष्णाचें बोलणें ऐकून कर्णानें लाजेने मान खाली घातली. चाक पृथ्वीतून निघाले नाही. तो तसाच युद्ध करू लागला, पण आतां त्याच्यात काही त्राण राहिले नव्हते अर्जुनाने एकच बाण मारून त्याचा वध केला, आणि कर्णाच्या शरिरातून निघालेलें तेज सूर्याला जाऊन मिळालें.

कर्णाचा वध झाल्यावर कौरवाकडे कोणालाच युद्धाचा उत्साह राहिला नाही सैन्य पळालें दुर्योधनाने कितीही सागितले तरी ते परत फिरेना. तेव्हा शल्याच्या सागण्यावरून युद्ध थाबवून सर्वजण आपल्या निवासस्थानी ( शिबिरात ) गेले ते शिबिरांत गेल्यावर मोठ्या आनन्दानें पाण्डव-सैन्यही आपल्या निवासस्थानी ( शिबिरात ) आले त्यानें मोठमोठ्याने गर्जना चालविल्या श्रीकृष्ण व अर्जुन धर्मराजाला आनन्दाने भेटले, आणि कर्णवधाची वार्ता त्यानी त्याला सागितली. धर्मराजा कर्णार्जुनांचें युद्ध पाहण्यास एकदा रणागणावर गेला होता, पण घायाळ झालेला असल्यामुळे त्याला अधिक वेळ त्या ठिकाणीं राहतां आलें नाही आता कर्णाचा वध झालेला ऐकून तो मुद्दाम रणागणांत गेला, आणि कर्ण मृत होऊन पडलेला आहे हे

जेव्हा त्याने प्रत्यक्ष डोळयानी पाहिलें, तेव्हा त्याला झालेल्या आनन्दाच्या भरात त्याने कृष्णार्जुनाना प्रेमानें आलिंगन देऊन सागितले, "आज मी धन्य आहे आजच मला जय मिळाला असें मी समजतों तेरा वर्षें कर्णाच्या भीतीनें मला झोप येत नव्हती आज मी मोठ्या आनंदानें झोपी जाईन" असें बोलून त्याने श्रीकृष्ण व अर्जुन याना धन्यवाद दिले

— कर्णपर्वाचा मराठी सारांश समाप्त —

---

# महाभारतसारांतील ‘ शल्यपर्वा ’चा मराठी सारांश

वैशम्पायन जनमेजय राजाला पुढें सांगूं लागले—

एकोणिसाव्या दिवशी सकाळी सञ्जय हस्तिनापुराला आला. त्यानें
जा धृतराष्ट्राला, दुर्योधनादि सर्वांचा नाश झाला, कृपाचार्य, कृतवर्मा
ाणि अश्वत्थामा हे तिघे कौरवाकडचे व पाच पाण्डव, श्रीकृष्ण आणि
ात्यकी असे सात पाण्डवाकडचे मिळून एकंदर दहा जण ह्या युद्धातून
ाचले, असें सांगितले. तें ऐकून सर्व पुत्राच्या आणि विशेषत दुर्योधनाच्या
त्यूमुळें दुःख होऊन धृतराष्ट्रानें फार शोक केला व नंतर सञ्जयाला युद्धाचें
र्णन करण्यास सांगितलें

तेव्हा सञ्जय म्हणाला—कर्णाचा मृत्यु झाल्यावर दुर्योधनादि सर्व सैन्य
रून शिबिरात आलें. तेव्हा कृपाचार्यांनी दुर्योधनाला सांगितलें की,
आता तरी पाण्डवाना राज्य देऊन त्याच्याबरोबर सन्धि कर. सैन्याचा
ाश झाला तेवढा पुरे झाला. उरलेल्या सर्वांना आनन्दानें आपापल्या घरी
ाऊ दे ’’ ते ऐकून दुर्योधन म्हणाला, “ गोष्ट इतक्या थराला आल्यावर
ाण्डव ऐकणार नाहीत, आणि पाण्डवाना शरण जाणें माझ्याकडून होणार
ाही. इतक्या लोकाचा नाश केल्यावर मी पाण्डवाना शरण जाईन तर
ोक मला काय म्हणतील ? आणि मुख्य म्हणजे आतापावेतो माझ्याकरितां
ज्यानी प्राणत्याग केला, त्याच्या ऋणातून मुक्त होण्याकरिता मला युद्ध
केलेंच पाहिजे ’’ असें बोलून दुर्योधनानें अश्वत्थाम्याला विचारलें की,
कर्णाच्या मागून सेनापति करण्यास कोण योग्य आहे ?’’ तेव्हा अश्वत्थाम्यानें
शल्याचें नाव सुचविलें. तें सर्वांना पसंत पडल्यामुळें दुर्योधनानें शल्याला
सेनापति-पदाचा अभिषेक केला.

धृतराष्ट्रानें प्रश्न केला—“सञ्जया, कर्णाचा मृत्यु झाला तेव्हां दोन्हीकडे
कती किती सैन्य उरलें होतें, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे ’’ सञ्जय
म्हणाला, “ कौरवाकडे रथ अकरा सहस्र ( ११,००० ), हत्ती दहा सहस्र
( १०,००० ), घोडे दोन लक्ष ( २,००,००० ), आणि पायदळ तीन कोटी

( ३,००००००० ) इतके सैन्य होते तर पाण्डवाकडे रथ सहा सहस्र ( ६,००० ), हत्ती सहा सहस्र ( ६,००० ), घोडे दहा सहस्र (१०,०००), आणि पायदळ दोन कोटी ( २,००००००० ) इतके सैन्य होते ”

( १८ ) अठराव्या दिवशी सकाळी दोन्ही सैन्ये समोरासमोर आल्यावर युद्धाला प्रारंभ झाला त्या युद्धात कर्णाचा पुत्र चित्रसेन याचा नकुळाने वध केला ते पाहून सुषेण आणि सत्यसेन या नावाचे कर्णाचे दुसरे दोन पुत्र नकुळावर बाण सोडीत धावून आले नकुळानें त्याचाही नाश केलेला पाहताच कौरव सैन्य भीतीने पळू लागले त्याला धीर यावा म्हणून शल्य पाण्डवाशी युद्ध करू लागला त्याने पाण्डव-सैन्यातील पुष्कळाचा नाश केला, व धर्मराजावर बाणाचा वर्षाव केला तेव्हा भीमाला राग येऊन त्यानें हातात गदा घेतली व शल्याच्या रथाचे घोडे मारून सारथ्यालाही मारून टाकले. सारथी पडल्यावर शल्य पळून गेला भीमसेन गदा घेऊन युद्धासाठी शल्याला हाका मारूं लागला, तेव्हा दुर्योधनादि कौरव-सैन्य त्याच्यावर चालून आले भीमाच्या साह्याला पाण्डव-सैन्य आल्यावर जें युद्ध झालें, त्यात दुर्योधनानें पाण्डवाकडून युद्ध करणाऱ्या चेकितान नावाच्या यादवाचा वध केला

शल्यानें पुन्हा येऊन धर्मराजावर तीक्ष्ण बाण सोडले तेव्हा धर्मराजानें आपल्या लोकाना सागितले की, “ शल्य माझा वाटा समजून मी त्याचा नाश करणार आहें म्हणून माझ्या रथात सर्व शस्त्रे सज्ज ठेवा माझ्या आपल्या रथाच्या डावीकडे धृष्टद्युम्न, उजवीकडे सात्यकि, मागें अर्जुन आणि पुढे भीम असें असल्यावर मी शल्यास जिंकू शकेन ” त्याप्रमाणें व्यवस्था केल्यावर धर्मराजा आणि शल्य एकमेकावर बाण सोडू लागले धर्मराजाने शल्याच्या रथाचे घोडे आणि ध्वज पाडला, तेव्हा अश्वत्थामा शल्याला आपल्या रथावर घेऊन पळून गेला काही वेळानें दुसऱ्या रथात बसून शल्य धर्मराजाबरोबर युद्ध करण्यास पुन्हा आला त्या दोघाचे युद्ध होत असता धर्मराजानें शक्ति नावाच्या शस्त्रानें शल्याचा नाश केला. त्याबरोबर दुर्योधन नको-नको म्हणत असताना सुद्धा शल्याच्या सैन्यातले सातशे ( ७,०० ) रथी पाण्डव-सैन्यावर चालून गेले. त्याचा नाश भीम, अर्जुन, नकुल आणि

सहदेव यांनी केला तेव्हा कौरवांचें सैन्य भीतीने पळून जाऊं लागले त्याला धैर्य देण्याकरिता दुर्योधनाने ओजस्वी भाषण केल्यावर ते सैन्य पुन्हा युद्धाला सिद्ध झाले त्यापैकी म्लेच्छाचा राजा शाल्व मस्त हत्तीवर बसून पुढे सरसावला. तेव्हा धृष्टद्युम्नाने त्या हत्तीला गदेने मारलें आणि सात्यकीने एक बाण सोडून शाल्वाचा नाश केला पुन्हा सैन्य पळू लागलें. त्याला मोठ्या कष्टाने परत फिरवून दुर्योधन युद्ध करू लागला तेव्हां धृष्टद्युम्नानें त्याच्या रथाचे घोडे आणि सारथी मारला मग दुर्योधन एका घोड्यावर बसून शकुनीकडे पळून गेला त्याच्या मागोमाग अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा हेही गेले

सञ्जय म्हणतो—"त्या वेळी धृष्टद्युम्नाबरोबर आम्ही पाचजणानी युद्ध केलें, पण आमचा पराभव होऊन आम्ही पळालो इतक्यात सात्यकीनें येऊन माझ्या सैन्याचा नाश केला आणि मला जिवंत धरलें "

दुर्योधन पळाल्यावर त्याचे भाऊ भीमसेनावर चालून गेले त्याचा नाश भीमानें केला आणि सहस्रावधि हत्ती, रथ इत्यादि सैन्यालाही यमलोकाला पाठविलें. आता दुर्योधन व सुदर्शन हे दोनच तुझे पुत्र घोडेस्वाराच्या सैन्याच्या मध्यभागी होते. त्या सैन्याचा नाश करण्यास भीम, अर्जुन व सहदेव हे तिथे आले तेव्हा सुदर्शन भीमाशी आणि त्रिगर्त-देशाचा राजा सुशर्मा व शकुनि अर्जुनाशी भिडले अर्जुनाने आपल्या बाणांनी सत्यकर्मा, सत्येषु आणि सुशर्मा याचा व त्याच्या सैन्याचा नाश केला, आणि भीमाने सुदर्शनाचा वध केला तेव्हा शकुनि व त्याचा पुत्र उलूक हे सहदेवावर धावून गेले सहदेवानें अगोदर उलूकाला आणि नतर शकुनीला बाणानी यमलोकास पाठविलें नतर उरलेल्या सर्व सैन्याला दुर्योधनाने आज्ञा केली की, "पाण्डवाचा नाश करूनच परत या " त्या आज्ञेप्रमाणे तें सर्व सैन्य पाण्डवसैन्यावर धावून गेले, आणि त्या सर्वांचा नाश पाण्डव-सैन्यानें केला.

धृतराष्ट्रानें विचारलें—कौरवाचे सर्व सैन्य नष्ट झाले तेव्हा पाण्डवाकडे किती सैन्य उरलें होतें ?

सञ्जय म्हणाला—दोन सहस्र ( २,००० ) रथ, सातशे ( ७०० ) हत्ती, पाच सहस्र ( ५,००० ) घोडेस्वार आणि दहा सहस्र ( १०,००० ) पायदळ इतकें सैन्य पाण्डवाकडचे उरले होते दुर्योधनाचा घोडा युद्धात पडल्यामुळें दुर्योधन हातात गदा घेऊन एकटाच डोहाकडे निघाला त्याच वेळीं धृष्टद्युम्नाच्या सागण्यावरून सात्यकी मला मारणार होता, पण व्यास महर्षींनीं येऊन मागितल्यामुळे त्यानें मला जिवत सोडले मी हातातले शस्त्र टाकून हस्तिनापुराकडे चाललो असता एक कोस ( २ मैल ) झाल्यावर मला दुर्योधन भेटला तो मला मोठ्या दु खाने म्हणाला, " धृतराष्ट्राला जाऊन साग की, तुमचा पुत्र दुर्योधन डोहात शिरला आहे " असे बोलून तो त्या डोहात शिरला आणि मन्त्रसामर्थ्यांने तळाशी जाऊन स्वस्थ बसला तो डोहात गेल्यावर कृपाचार्य, कृतवर्मा आणि अश्वत्थामा हे तिघे त्याचा शोध करीत तेथे आले मी त्याना दुर्योधन जिवत असल्याचे व तो डोहात जाऊन बसल्याचे सागितले इतक्यात त्याचा शोध करण्याला पाण्डव येत आहेत असें पाहून त्यानी मला रथात घेतले आणि आम्ही शिबिराकडे आलो सर्व सैन्याचा नाश झाल्याची वार्ता शिबिरात कळल्यावर सर्व स्त्रिया ऊर बडवून आक्रोश करू लागल्या दुर्योधनाचे प्रधान त्या स्त्रियाना घेऊन हस्तिनापुराकडे निघाले, तेव्हा धर्मराजाला विचारून युयुत्सु त्याच्याबरोबर गेला

## — गदापर्व —

शिबिरातून सर्व निघून गेल्यावर अश्वत्थामादि तिघाना तेथे राहणे बरें वाटेना ते त्या डोहाकडे जाण्यास निघाले इकडे पाण्डवानी दुर्योधनाचा पुष्कळ शोध केला पण त्याचा शोध न लागल्यामुळें निराश होऊन ते आपल्या निवासस्थानी ( शिबिरात ) आले ते शिबिरात आल्यावर हे तिघे त्या डोहापाशी जाऊन पोचले ते तिघे दुर्योधनाबरोबर बोलत असतां काही व्याध तेथें आले दुर्योधन डोहात आहे ही गोष्ट त्याच्या लक्षात आली, आणि त्यानी ती गोष्ट पाण्डवाना जाऊन सागितली त्याबरोबर धर्मराजादि सर्वजण मोठ्या आनन्दानें दुर्योधनाच्या नाशाकरिता तेथें जाण्यास निघाले त्याचे शब्द दुरूनच ऐकून " पाण्डव येत आहेत, तेव्हां

आम्ही आता जातो " असें सांगून ते तिथे दूर जाऊन एका वडाच्या झाडाखाली बसले

ते तिथे गेल्यावर पाण्डव तेथें आले श्रीकृष्णाच्या सागण्यावरून धर्मराजाने दुर्योधनाची चागली (खूप) निन्दा केली तेव्हा सतापून तो पाण्याच्या बाहेर आला धर्मराजानें त्याला कवच (चिलखत) आणि शिरस्त्राण (जिरेटोप) दिल्यावर तें घालून व हातात गदा घेऊन भीमाबरोबर युद्ध करण्यास तो सिद्ध झाला इतक्यांत बलराम तीर्थयात्रा करून तेथे आले. त्याच्या सागण्यावरून ती सर्व मण्डळी कुरु-क्षेत्रावर आली, तेथें त्या दोघाचें (भीमसेन व दुर्योधन) युद्ध होऊं लागले कोणाचाच जय किंवा पराजय होताना दिसेना तेव्हा अर्जुनाच्या प्रश्नावरून श्रीकृष्णांनी सागितले, " भीम त्याच्यापेक्षा शक्तिमान् आहे खरा, पण गदायुद्धाचा अभ्यास दुर्योधनाचा अधिक असल्यामुळे अन्याय केल्यावाचून भीम त्याला मारू शकणार नाही. भीमाने त्याची माडी फोडण्याची प्रतिज्ञा केली आहे त्याप्रमाणे केलें तरच दुर्योधन जिकला जाणे शक्य आहे " तें ऐकून अर्जुनाने भीमाला दिसेल अशा रीतीने आपल्या डाव्या माडीवर थाप मारली तें पाहून भीमाच्या लक्षात ती गोष्ट आली आणि युद्ध होता होता भीमानें एकदम आपली गदा दुर्योधनाच्या डाव्या माडीवर मारली. त्याबरोबर दुर्योधन खालीं कोसळला. तो खालीं पडल्यावर, " तूं आम्हाला भर सभेत गाय रे गाय असें म्हणून हसत होतास त्याचें हे फळ भोग." असें बोलून भीमानें त्याच्या मस्तकावर लाथ मारली त्यामुळें धर्मराजाला फार दु ख झाले आणि बलराम तर नागर घेऊन भीमाला मारावयालाच धावले तें पाहून श्रीकृष्णानी त्यांची कशी तरी समजूत केल्यावर ते रागाने द्वारकेकडे निघून गेले

नतर दुर्योधन श्रीकृष्णाना म्हणाला, " तू फार दुष्ट आहेस भीष्म, द्रोण, कर्ण, भूरिश्रवा इत्यादींना अन्यायाने मृत्यु येण्याचें कारण तूच आहेस मी भीमाबरोबर युद्ध करीत असतां भीमाला डाव्या माडीवर गदा मारण्यासाठी खूण करण्यास अर्जुनाला जे तूं सागितलेंस ते माझ्या लक्षात आलें नाहीं, असे नाही असा अन्याय करण्यास तुला लाज वाटायला हवी होती. तुझ्या अन्यायामुळेच आमचा पराभव झाला " दुर्योधनाचे तें बोलणे ऐकून

श्रीकृष्ण म्हणाले, " तू आपल्या पातकामुळेंच मेलास, त्याचा दोष मला लावू नकोस भीमाला विष देणें, पाण्डवाना लाक्षागृहात जाळणें, भर सभेंत रजस्वला अवस्थेंत असलेल्या, महासती–द्रौपदीची विटम्बना करणें, अभिमन्यूला पुष्कळांनीं मिळून मारणें इत्यादि अन्याय तू केले नसतेस, पाण्डवाना ःयाचें राज्य अगोदरच दिले असतेंस तर भीष्म-द्रोणाचा आणि तुझाही नाश झाला नसता आम्हीं केलेले अन्याय हे तुझ्या अन्यायाची प्रतिक्रियाच होती म्हणून आम्हाला दोष न देता स्वत· केलेल्या कर्मांची फळें भोग "

त्यानंतर श्रीकृष्णासह सर्वजण शिबिरात आले श्रीकृष्णानीं अर्जुनाला रथावरून अगोदर खाली उतरण्यास सागितलें आणि आपण मागून उतरले. तेव्हां आपलेही काम झाले असें समजून मारुतीहीं निघून गेला श्रीकृष्ण उतरताच अर्जुनाचा रथ जळून गेला तें आश्चर्य पाहून अर्जुनानें तसें होण्याचें कारण विचारले तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले, " मी तुझ्या रथावर सारथी असल्यामुळें आणि तुझें काम पुरें झालें नसल्यामुळें तुझा रथ आता-पर्यन्त जळला नाही पण आता तुझें काम संपलें मला सारथी म्हणून त्या रथावर बसण्याचें कारण नाहीं, म्हणून युद्धात भीष्म-द्रोणादिकानी सोडलेल्या दिव्य अस्त्रामुळें तुझा रथ जळून भस्म झाला "

त्यानतर पाण्डव-सैन्य कौरवाच्या शिबिरात शिरले त्याला तेथें चादी, सोनें, हिरे, माणकें, दास-दासी इत्यादि पुष्कळ लूट मिळाली श्रीकृष्णानी पाण्डव व सात्यकी याना सागितलें की, आपण आतां शिबिराच्या बाहेर रात्र काढू या त्याप्रमाणें ते सर्व ओघवती नदीच्या काठी रात्रभर राहण्यास गेले. तेथें गेल्यावर धर्मराजाच्या मनांत गान्धारीच्या रागाची व कदाचित् आपल्याला ती शाप देऊन भस्म करील या गोष्टीची चिन्ता उत्पन्न झाली म्हणून त्यानें श्रीकृष्णाना गान्धारीकडे पाठविलें. श्रीकृष्ण हस्तिनापूरला जाऊन धृतराष्ट्र आणि गान्धारी याना मोठ्या युक्तीच्या भाषणानें शात करून पुन्हा पाण्डवाकडे आले

कृपाचार्यादि तिघांना दुर्योधन पडल्याची बातमी लोकाकडून कळताच ते दुर्योधन पडला होता तेथें आले अकरा अक्षौहिणी सैन्याचा स्वामी

दुर्योधन तेथें धूळ खात पडलेला पाहून त्यानी फार शोक केला अश्वत्थामा तर असें म्हणाला की, " प्रत्यक्ष माझ्या पित्याच्या मृत्यूपेक्षा, राजा, तुझ्या ह्या दीन स्थितीचें मला फार दु ख वाटत आहे. मी प्रतिज्ञा करून सागतो की, मी आज कोणत्याही उपायानें पाण्डव-सैन्याचा नाश करून टाकीन. या गोष्टीला तुझी मात्र संमती हवी. " ते ऐकून दुर्योधनाला आनंद झाला आणि कृपाचार्यांच्या हातून अश्वत्थाम्याला त्यानें सेनापतीचा अभिषेक करविला अभिषेक झाल्यावर दुर्योधनाचा निरोप घेऊन ते तिघे तेथून निघाले आणि दुर्योधन रात्रभर तेथेंच आपल्या हातानी मोठ्या कष्टानें मांडीचे लचके तोडणाऱ्या गिधाडाना हाणीत, रक्तबंबाळ स्थितीत पडून राहिला.

— शल्यपर्वाचा मराठी साराश समाप्त —

---

## महाभारतमार्गंतील ' सौप्तिकपर्वा 'चा मराठी सारांश

कृपाचार्य, कृतवर्मा आणि अश्वत्थामा हे तिघे दुर्योधनाजवळून निघाल्यावर एका अरण्यात मोठ्या वडाच्या झाडाखाली रथ सोडून संध्या केल्यावर थकून गेलेले असल्यामुळें तेथे जमिनीवरच निजले दोघांना तर झोप लागली पण अश्वत्थामा मात्र रागामुळे व दुःखामुळे झोपी गेला नाही चांगली रात्र झाल्यावर त्या वडाच्या झाडावर झोपी गेलेल्या कावळ्यांना एक घुबड येऊन मारून टाकीत आहे, असे अश्वत्थाम्याला दिसलें. ते पाहून घुबडाने आपल्याला गुरूपदेश केला असे समजून निजलेल्या पाण्डवसैन्याचा असाच नाश करावा, हा विचार मनात ठरवून त्याने झोपीं गेलेल्या त्या दोघांना जागे करून आपला विचार सांगितला तेव्हा " असें करणें योग्य नाही, हा अधर्म आहे, यानें तुझी लोकात छी-थू होईल." इत्यादि कृपाचार्यांनी सांगून पाहिले पण ते न ऐकून जेव्हा अश्वत्थामा पांडवाच्या शिबिरात जाण्यासाठी रथात बसला, तेव्हा ते दोघे सुद्धां त्याच्याबरोबर निघाले

पांडवाच्या निवास-स्थानाजवळ ( शिबिराजवळ ) गेल्यावर अश्वत्थामा म्हणाला, " तुम्ही दोघे दरवाजावर राहून आतून पळून येणाऱ्यांना ठार मारा. मी आत जाऊन झोपलेल्या लोकांचा नाश करतो " इतके बोलून तो प्रथम धृष्टद्युम्नाजवळ गेला, आणि लाथांनी त्याला मारूं लागला. धृष्टद्युम्न जागा होऊन उठू लागला, तेव्हा अश्वत्थाम्याने त्याला दोन्ही हातांनी धरून भूमीवर आपटलें, आणि शस्त्रावाचून एखाद्या पशूला मारावे, त्याप्रमाणे त्यानें धृष्टद्युम्नाला ठार मारले यानंतर शिखण्डी, द्रौपदीचे पुत्र इत्यादि जे तेथें होते, त्या सर्वांचा नाश अश्वत्थाम्यानें केला जे पळून जाण्याच्या विचारानें शिबिराच्या दरवाजावर आले, त्यांचा नाश कृपाचार्य व कृतवर्मा यांनीं केला. सर्वांचा नाश केल्यावर मोठ्या आनंदाने ते तिघे दुर्योधनाकडे आले, आणि त्यांनी तो सर्व वृत्तांत त्याला सांगितला तो ऐकून तशाही स्थितीत त्याला आनंद झाला, आणि थोड्याच वेळाने त्याने प्राण सोडला

सञ्जय म्हणतो—हे धृतराष्ट्र राजा ! तुझ्या वाईट सल्ल्यामुळे, अन्यायी वागण्यामुळे व घोर अपराधामुळेच अशा रीतीने कौरवाचा आणि पाण्डव-सैन्याचा युद्धात सम्पूर्ण नाश झाला, आणि दुर्योधनाच्या मृत्यूनंतर व्यासानी पूर्वी मला दिलेली दिव्य-दृष्टि नष्ट झाली

वैशम्पायन जनमेजय राजाला म्हणाले—राजा, प्रात काळी धृष्टद्युम्नाचा सारथी धर्मराजाकडे येऊन सागू लागला—"शिबिरातील सर्व सैन्य कृपाचार्य, कृतवर्मा आणि अश्वत्थामा या तिघानी मारून टाकलें मी कृतवर्म्याच्या हातून कसा तरी निसटलो" तें ऐकल्यावर धर्मराजाने काही वेळ शोक करून द्रौपदीला आणण्यास नकुळाला पाठविले आणि तो स्वत सर्वांसह शिबिरात गेला काही वेळानें द्रौपदी तेथे आली पुत्राच्या मृत्यूमुळे तिला फार दु ख झाले, त्या दु खाने ती द्रौपदी म्हणाली, "माझ्या पुत्राचा घात करणारा अश्वत्थामा जिवत असेपर्यन्त मी काही न खाता, न पिता येथेच बसून राहणार आहें" असे म्हणून ती तेथेच बसली तेव्हा धर्मराजानें तिला विचारलें, "अश्वत्थामा पळून गेला आहे त्याला युद्धात जिकल्याचें तुला कशावरून खरे वाटेल ते साग" द्रौपदी म्हणाली, "अश्वत्थाम्याच्या मस्तकावर जन्मत च एक मणी आहे तो आणून तुमच्या मस्तकावर शोभा देताना पाहिला, तरच मी जिवत राहीन, एरव्ही नाही"

तें ऐकताच भीमसेन रथात बसून अश्वत्थाम्याच्या नाशाकरिता निघाला. नकुळ त्याचा सारथी होता भीम निघालेला पाहून श्रीकृष्ण धर्मराजाला म्हणाले, "भीमाला एकट्याला जाऊ देणें योग्य नाही कारण अश्वत्थामा जसा शूर आहे, जसा शस्त्रास्त्रवेत्ता आहे, तसाच अत्यंत दुष्टही आहे. त्याच्या दुष्टपणाची एक गोष्ट सागतो द्रोणाचार्यांनी अर्जुनाला ब्रह्मास्त्र दिलें ते ऐकून अश्वत्थामा एकान्तात द्रोणाचार्यांना ब्रह्मास्त्र मागू लागला. तो दुष्ट आहे म्हणून द्रोणाचार्यांनी ते त्याला दिले नव्हते पण या वेळीं त्यानें फारच गयावया केल्यामुळें त्यानी ते अस्त्र त्याला दिलें, आणि सागितलें की, हें अस्त्र मनुष्यावर सोडू नये असा याचा नियम आहे पण तू दुष्ट असल्यामुळे हा नियम पाळणार नाहीस. ब्रह्मास्त्र मिळाल्यावर एकदा अश्वत्थामा द्वारकेला आला यादवानी मोठ्या आदराने त्याला ठेवून

घेतलें एके दिवशीं तो माझ्याकडे येऊन माझें सुदर्शन-चक्र मागू लागला मी त्याला घे म्हटल्यावर तो चक्र उचलू लागला, पण त्याला ते उचलेना तेव्हा त्याला फारच लाज वाटली नंतर मी त्याला विचारले, 'तू चक्र घेऊन काय करणार?' तो म्हणाला, 'मी ब्रह्मास्त्राने इतराना जिकू शकेन, पण तुम्हाला जिकू शकणार नाही तेव्हा तुमच्या जवळून चक्र घेऊन तुम्हालाच जिकावें असा माझा विचार होता' त्यानतर काही दिवसानी तो द्वारकेंतून निघून गेला तर धर्मराजा, तो असा दुष्ट आहे म्हणून एकटा भीम जाणे योग्य नाही" असे बोलून श्रीकृष्ण रथात बसले धर्मराजा आणि अर्जुन त्याच रथात बसून निघाले

भीमसेन निघाला तो गगेच्या काठावर व्यास महर्षींच्या आश्रमात आला कारण, तो दुष्ट नराधम अश्वत्थामा तेथेंच आहे अशी बातमी भीमाला माहीत होती. भीमाच्या मागोमाग श्रीकृष्णाचाही रथ आला तें पाहून, आता हे आपल्याला मारणार या भीतीनें पाण्डवाच्या नाशासाठी अश्वत्थाम्याने ब्रह्मास्त्र सोडले. तेव्हा श्रीकृष्णाच्या सागण्यावरून पाण्डवांच्या आणि सर्वांच्याच रक्षणाकरिता अर्जुनानें सुद्धा ब्रह्मास्त्र सोडले दोन्ही अस्त्रांचें तेज सर्व लोकाचा नाश करील, म्हणून व्यास महर्षी व देवर्षि नारद यानी मध्यें पडून दोघानाही अस्त्र आवरून घेण्यास सागितलें त्याप्रमाणें अर्जुनानें ताबडतोब ब्रह्मास्त्र आवरून घेतले पण अश्वत्थाम्याला तें आवरता येईना तेव्हा ऋषी म्हणाले, "जेथे ब्रह्मास्त्राचें युद्ध होतें, त्या ठिकाणी बारा वर्षे पाऊस पडत नाही, आणि दुष्काळ पडतो आमच्या सागण्यावरून अर्जुनानें अस्त्र आवरले आहे तुला अस्त्र आवरता येत नसेल तर तुझ्या मस्तकावर असलेला मणि पाण्डवाना दे आणि हे अस्त्र पाण्डवा-वर सोडू नको तरच तू जिवंत राहशील" ते ऐकून त्यानें तें अस्त्र उत्तरेच्या गर्भावर सोडलें

ते पाहून श्रीकृष्ण त्याला म्हणाले, "उत्तरेच्या गर्भाला तर मी जिवत करीनच, पण गर्भहत्या (भ्रूणहत्या) करणारा तू महा दुष्ट आणि पातकी असल्यामुळें या पापाचें फळ याच जन्मी (याचि देही, याचि डोळा—तुकाराम) तुला भोगावें लागेल. तीन सहस्र (३,०००) वर्षे तुझ्या

